संद्रिय शेती/ विषमुक्त शेती या राज्यपुरस्कृत योजनेअंतर्गत डॉ.पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशन राबविण्यासाठी निधी उपलब्ध करून देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२७२०/प्र.क्र.४१/१-अे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय,विस्तार,मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २४ जुलै, २०२०

<u>वाचा</u> : १. शासन निर्णय, कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग क्रमांक:जैशेमि-१०१८/प्र.क्र. १२५/१७-अे दि. १६.१०.२०१८

२. शासन निर्णय, कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग क्रमांक:योजना-३३३९/प्र.क्र.९६/१-अे दि. १४.०८.२०१९ व दि.२८.०८.२०१९

३. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३ दि.०४.०५.२०२०

४.कृषि आयुक्तालयाचे क्र.मृसंमृचा/मिशन/पूर्न/१२७१७/२०२० दि.१२ मे, २०२० चे पत्र.

**प्रस्तावना:-**

संद्रिय शेती/विषमुक्त शेती या राज्यपुरस्कृत योजनेअंतर्गत डॉ.पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशन राबविण्यास संदर्भ क्र.१ वरील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. सन २०२०-२१ या वर्षात सदर योजनेच्या अंमलबजावणी करण्याकरिता रू.२०७५.९७ लक्ष निधी इतकी तरतूद करण्यात आलेली आहे. कार्यक्रमांतर्गत योजनांसाठी सन २०२०-२१ मधील अर्थसंकल्पीय निधीच्या ३३% निधी उपलब्ध होईल, असे संदर्भ क्र.२ वरील शासन निर्णयात नमूद केले आहे. सदर योजना राबविण्यासाठी वित्त विभागाने अर्थसंकल्पित रकमेच्या १०% निधी वितरीत करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यास अनुसरून डॉ.पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशन करिता निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये सेंद्रिय शेती/विषमुक्त शेती या राज्यपुरस्कृत योजनेअंतर्गत डॉ.पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशन राबविण्याकरिता अर्थसंकल्पित केलेल्या रू.२०७५.९७ लक्ष रकमेपैकी १०% म्हणजेच रू.२०७.५९ लक्ष (अक्षरी रू. दोन कोटी सात लक्ष एकोणसाठ हजार फक्त) इतकी निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध करून देण्यात येत आहे.

२. सदर निधी खालील लेखाशिर्षांतर्गत चालु वर्षी अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीतून खर्ची टाकावा.
मागणी क्र. डी-३
२४०१, पीक संवर्धन
(००)(३७) सेंद्रिय शेती/विषमुक्त शेती (राज्य कार्यक्रम) डॉ.पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशन
३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)
लेखाशिर्ष-(२४०१ A९३१)

३. वितरीत करण्यात येणाऱ्या सदर योजनेच्या निधीसाठी नियंत्रण अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी म्हणून खालील प्रमाणे घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे | सहाय्यक संचालक, (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे |
| २ | जिल्हास्तर | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, अकोला | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, अकोला कार्यलयातील लेखाधिकारी |

४. सदर निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचना व प्रचलित अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक: अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३ दि.०४.०५.२०२० तसेच दि.२६.०५.२०२० मधील अटी व शर्तींचे अनुपालन करण्याच्या अटीच्या तसेच वित्त विभाग अनौपचिरीक संदर्भ क्र.१०९/व्यय-१, दिनांक ०६.०७.२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून सांकेतांक २०२००७२४१५३३१०१५०१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2020.07.24 15:44:28 +05'30'

**(उमेश चांदिवडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई -४०००६
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय मुंबई ३२.
३. मा. मंत्री (कृषि) यांचे खासगी सचिव , मंत्रालय मुंबई ३२.
४. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खासगी सचिव, मंत्रालय मुंबई ३२
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
६. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई
७. आयुक्त(कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. सह सचिव(निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
९. संचालक, (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.उपसचिव(व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

११.उपसचिव(कार्या १४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१२.महालेखापाल १/२, लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा, मुंबई/नागपूर.

१३.संचालक, लेखा व कोषागार, मुंबई

१४.सर्व विभागीय कृषि सहसंचालक.

१५.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

१६.प्रकल्प संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशन,अकोला.

१७.निवडनस्ती(कार्या १-अे.)